**अर्थसंकल्पीय अनुदान , सन २०१७-१८**
**मागणी क्र. वाय-०७ , ७६१०, शासकीय**
**कर्मचारी इत्यादींना कर्ज (योजनेतर)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी -१६१७/प्र.क्र.२१९/पापु-१५

सातवा मजला , गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१
तारीख: २८ जुलै,२०१७

वाचा -

**शासन परिपत्रक,वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दिनांक १८.०४.२०१७.**

प्रस्तावना -

वित्त विभागाने दिनांक १८ एप्रिल २०१७ च्या शासन परिपत्रकान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०१७ , नुसार वित्तीय वर्ष २०१७-१८ च्या एकुण अर्थसंकल्पीय योजनांतर्गत व योजनेतर तरतूदींपैकी ८०% निधी सन २०१७-१८ च्या पहिल्या नऊ महिन्यांकरिता ( डिसेंबर २०१७ अखेर) अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे.

सन २०१७ -१८ या आर्थिक वर्षातील पहिल्या नऊ महिन्यांकरिता ( डिसेंबर २०१७ अखेर) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेचा आस्थापनाविषयक खर्च भागविण्यासाठी " ७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना. कर्जे" या लेखाशीर्षाखाली पाणी पुरवठा विभागास एकुण रु. १,२७,४५,००० ( एक कोटी , सत्तावीस लाख , पंचेचाळीस हजार मात्र ) इतकी एकत्रित तरतूद मंजुर करण्यात आली आहे. या अनुदानापैकी रु. ६५,१४,००० /- ( रुपये पासष्ट लाख , चौदा हजार मात्र ) एवढे अनुदान माहे एप्रिल ते डिसेंबर २०१७ अखेरपर्यंतचा खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहे. सदर अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

## शासन निर्णय -

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेअंतर्गत कार्यरत शासकीय कर्मचा-यांना कर्जे इ. वरील खर्च भागविण्यासाठी" ७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना. कर्जे" या लेखाशीर्षाखाली माहे एप्रिल ते डिसेंबर २०१७ या कालावधीपर्यतचा नऊमाही खर्च भागविण्यासाठी पुढील विवरणपत्रात स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे रु. ६५,१४,००० /- ( अक्षरी रुपये पासष्ट

लाख , चौदा हजार मात्र) इतके अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना या शासन निर्णयाद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उपशीर्ष | सन २०१७-१८ करिता ७६१० अंतर्गत मंजुर तरतूद | अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेली रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | २०१- घरबांधणी अग्रीम (७६१०१५८४) | १,१०,२५,००० | ५३,३८,००० |
| २ | २०२ मोटार वाहनांच्या खरेदीसाठी अग्रिम (७६१० १५९३) | ११,९१,००० | ९,५२,८०० |
| ३ | २०३ इतर वाहन खरेदी अग्रिम (७६१०१६०१) | ९,००० | ७,२०० |
| ४ | २०४ वैयक्तिक संगणक खरेदीसाठी अग्रिम ( ७६१०१९४२) | ५,२०,००० | २,१६,००० |
| एकुण अनुदान | | १,२७,४५,००० | ६५,१४,००० |

उपरोक्त बाबींवरील खर्च मागणी क्र.वाय-०७ , ७६१०- शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे या प्रधान लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा. तसेच उपलब्ध तरतूद मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे खर्च करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२८१०४५२९८५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirti Bhargav Mohite

Digitally signed by Kirti Bhargav Mohite
DN: CN = Kirti Bhargav Mohite, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply And Sanitation Department
Date: 2017.07.28 17:22:20 +05'30'

**(कीर्ती मोहिते)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा , पुणे

२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा , सर्व
४. उप अभियंता (यां), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा , सर्व
५. महालेखापाल , महाराष्ट्र १ मुंबई/२ नागपूर ( लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प १६ (२ प्रती)
७. कक्ष अधिकारी /लेखा अधिकारी पापु-०४, पापु-२०
८. निवड नस्ती पापु-१५